**भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील कनिष्ठ भूवैज्ञानिक संवर्गातील अधिका-यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत श्री.हितेश दिलीप अहिरे**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः : आपना ०२२२/प्र.क्र.११८/पापु-१५**

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१.
तारीख: ४ मे, २०२२

**वाचा :-**

१) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः** परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६
२) **शासन आदेश,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना ४५१२/प्र.क्र.२६८/पापु-१५ दिनांक. १८ फेब्रुवारी २०१३
३) **आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्रमांक :** प्रशासन/आस्था-१/श्री.अहिरे/कभूवै/वै.पं.२८१/७१/२०२२ दि.१/२/२०२२

**प्रस्तावना :-**

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील "कनिष्ठ भूवैज्ञानिक"या पदावर संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीकरिता अधिका-यांच्या नियुक्ती करण्यात आली आहे. या नियुक्त्या महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेल्या शिफारशीनुसार या पदावर शासन सेवेत प्रथम नियुक्तीने करण्यात आलेल्या आहेत.

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये शासन सेवेतील अधिकारी/कर्मचारी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत सुधारीत मार्गदर्शक सूचना पारित करण्यात आल्या असून कनिष्ठ भूवैज्ञानिक भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा या पदावर पदस्थापना दिलेलया अधिका-यांनी त्यांचा २ वर्षांचा परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केलेला असल्याने व तशी शिफारस संचालनालयाने संदर्भाधीन क्रमांक ३ येथील पत्रान्वये केलेली असल्याने या अधिका-यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करून त्यांना नियमित "कनिष्ठ भूवैज्ञानिक"म्हणून स्थानापन्न नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील खालील "कनिष्ठ भूवैज्ञानिक" यांनी त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणा-या बाबी समाधानकारकरित्या पूर्ण केलेल्या असल्याने स्तंभ क्रमांक ५ मध्ये दर्शविलेल्या दिनांकापासून त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यास व त्यांच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | परिविक्षाधीन अधिकाऱ्यांचे नाव | कनिष्ठ भूवैज्ञानिक पदावर रुजू झाल्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | कनिष्ठ भूवैज्ञानिक पदावरील सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ५ | ६ |
| १ | श्री.हितेश दिलीप अहिरे | २१.२.२०१३ | १७.३.२०१५ | १८.३.२०१५ |

आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना कळविण्यात येते की, उक्त कनिष्ठ भूवैज्ञानिक यांच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्याच्या अनुषंगाने उचित कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६ मधील तरतुदींन्वये व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. परिवी-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५०२१८१५१२५१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, serialNumber=1325a2533f628572438b5fb711c805de49788678b97015bb0cac990e3b375423, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2022.05.04 12:32:36 +05'30'

**(गणेश पवार)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
२. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे
३. महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. महालेखापाल,लेखापरीक्षा-१/२, महाराष्ट्र, मुंबई, नागपूर.
६. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व).
७. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व).
८. श्री.हितेश दिलीप अहिरे, कनिष्ठ भूवैज्ञानिक (संचालनालयामार्फत).
९. निवडनस्ती (कार्यासन, पापु-१५).